मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत मौ.खैरापाडा (ता. जि. पालघर) नळ पाणीपुरवठा योजनेच्या अंदाजपत्रकास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मुपेयो-२०१९/प्र.क्र.७१/पापु-१९**
७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल,
मंत्रालय, मुंबई-४०० ००१.
दिनांक: १५ सप्टेंबर, २०२०

वाचा
१) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पालघर यांचे आदेश क्र.पाजिप/पापुवि/वशी/पी.बी-१/३०४/१८, दि.१६ एप्रिल, २०१८
२) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पालघर यांचे पत्र क्र.पाजिप/पापुवि/पीबी ०३/२२४/२०२०, दि.०६ जुलै, २०२०
३) अधीक्षक अभियंता, भारत निर्माण कक्ष, ठाणे यांचे पत्र क्र.भानिक/कोवि/आस्था/०९/२०२०, दि.०६ मार्च, २०२०

**प्रस्तावना:-**

मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत संदर्भाधीन क्र. १ येथील आदेशान्वये मौ. खैरापाडा (ता.जि. पालघर) येथील नळ पाणी पुरवठा योजनेच्या रु.२९०.९४ लक्ष इतक्या ढोबळ किंमतीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान केली आहे. तथापि, सदर योजनेच्या निविदा १३ टक्के जादा दराने स्विकृत करण्यात आल्याने योजनेच्या किंमतीत वाढ झाली आहे. त्यामुळे मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पालघर यांनी संदर्भाधीन क्र. २ च्या पत्रान्वये रु.३२८.८२ लक्ष (ढोबळ) इतक्या किंमतीचे सुधारित अंदाजपत्रक प्रशासकीय मान्यतेसाठी शासनास सादर केले आहे. सदर सुधारित अंदाजपत्रकास अधीक्षक अभियंता, भारत निर्माण कक्ष, ठाणे यांनी संदर्भाधीन क्र. ३ येथील आदेशान्वये तांत्रिक मान्यता प्रदान केली आहे. त्यानुसार मौ. खैरापाडा (ता. जि. पालघर)) येथील नळ पाणी पुरवठा योजनेच्या सुधारित अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

उपरोक्त प्रस्तावनेत नमुद केलेली वस्तुस्थिती विचारात घेता, मौ. खैरापाडा (ता. जि. पालघर) येथील नळ पाणी पुरवठा योजनेच्या रु. ३२८.८२ लक्ष (अक्षरी रुपये तीन कोटी अठ्ठावीस लाख ब्यांऐंशी

हजार फक्त) इतक्या ढोबळ किंमतीच्या अंदाजपत्रकास मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत पुढील अटींच्या अधीन राहून सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१) सदर योजना जिल्हा परिषदेमार्फ़त कार्यान्वित करण्यात येईल.

२) सदर योजनेच्या मूळ प्रशासकीय मंजुरी दिलेल्या आदेशातील व तांत्रिक मान्यतेच्या आदेशातील अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करावे.

३) तसेच मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत वेळोवेळी निर्गमित करण्यात आलेल्या मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

४) सन २०१३ मधील CAG च्या अहवालानुसार राज्यातील २१% पाणीपुरवठा योजना या देखभाल दुरुस्ती अभावी वीजदेयके न भरल्यामुळे बंद पडल्या असल्याचे दिसून येते. त्यामुळे सदर योजना आर्थिकदृष्ट्या सक्षम राहण्यासाठी पाणीपट्टी दरामध्ये आवश्यकतेनुसार वेळोवेळी वाढ करण्यात यावी.

५) योजनेची चाचणी घेतल्यानंतर योजना संबंधित ग्रामपंचायतीकडे हस्तांतरित करुन लेखे बंद करण्यात यावेत.

६) योजना राबविणे त्याचे परिरक्षण, दुरुस्त्या (विशेष दुरुस्त्या धरुन) यासाठी दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी, योजनेतील घसारा किंवा यंत्रसामुग्री नुतनीकरणासाठी संबंधित ग्रामपंचायतीस/ जिल्हा परिषदेस शासनाकडून कोणतीही मदत/अनुदान मिळणार नाही.

७) हागणदारी मुक्तीबाबतच्या प्रचलित धोरणानुसार कार्यवाही करण्यात यावी.

८) योजना पुर्नसुधारित होणार नाही, याची जबाबदारी जिल्हा परिषदेची राहील.

९) योजनेची उर्वरित कामे विहित मुदतीत पूर्ण करण्यात यावीत.

२. या योजनेच्या सुधारित किंमतीतील वाढीव खर्च रु.३७.८८ लक्ष (अक्षरी रुपये सदतीस लाख अठ्ठ्याऐंशी हजार फक्त) हा मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमातर्गत राज्य हिश्श्यातून उपलब्ध होणा-या निधीतून करण्यात यावा.

३. प्रस्तुत योजनेस सुधारीत प्रशासकीय मान्यता ही वित्त विभागाच्या क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/ २०१३/विनियम, भाग-२, दि.१७ एप्रिल, २०१५ या शासन निर्णयातील भाग पहिला, उपविभाग-३ मधील अ.क्र. ६ (सहा) परिच्छेद क्र. २७ (अ) अनुसार या विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार देण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००९१११५०२४२०३२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VASANT BHIMRAO MANE

Digitally signed by VASANT BHIMRAO MANE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=280e2beac20f526041fee94f6226522e1407a7f6aa0b06c8769634d48c2976bc, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=VASANT BHIMRAO MANE
Date: 2020.09.15 13:51:31 +05'30'

**(वसंत भि. माने)**

**अवर सचिव , महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. सभापती, महाराष्ट्र विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
२) मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
३) मा. उप सभापती, महाराष्ट्र विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
४) मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
५) मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा/विधान परिषद
६) मा. विधानमंडळ सदस्य/संसद सदस्य (सर्व)
७) मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
८) मा.राज्य मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
९) अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१०) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर्स, मुंबई-२१,
११) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पालघर
१२) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र -१, मुंबई
१३) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर
१४) मुख्य/अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, ठाणे
१५) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई
१६) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, पालघर
१७) निवड नस्ती (पापु-१९)